महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना
अनुदान वितरीत करण्याबाबत.
नगर परिषद, वाशिम, जि. वाशिम

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः सुनिअ २०१३/प्र.क्र.४९५/पापु.२२
गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १४ ऑक्टोबर, २०१५

वाचा :

(१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
(२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दिनांक २३ डिसेंबर, २००८
(३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २०१२/प्र.क्र.१५४/पापु.२२ दिनांक १५.३.२०१२
(४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र- सुनिअ २०१३/प्र.क्र.४९५/पापु-२२, दि.२१.२.२०१४
(५) मुख्य अभियंता, म.जी.प्रा. प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ. प्र.व्य.स.से./पुणे/तांशा-४/प्र.क्र.६४/११४८/२०१२, दि.१६.६.२०१२
(६) मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांचे पत्र क्र.नपवा/ कार्या-१९/ सुनिअ/१३५६/१५, दि.२२.७.२०१५

प्रस्तावना :

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. शासन निर्णय, दि.१५.३.२०१२ अन्वये, महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत वाशिम शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.११३.४० लक्ष इतक्या ढोबळ किमतीच्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि, मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांनी दिनांक १६.६.२०१२ च्या पत्रान्वये सदर योजनेच्या रु.

९९,७०,६२०/- इतक्या निव्वळ रकमेच्या सुधारणा कामास तांत्रिक मंजूरी दिली आहे. प्रशासकीय मंजूरीच्या दि. १५.३.२०१२ च्या शासन निर्णयानुसार सदर योजनेच्या निव्वळ खर्चावर १% लेबर वेलफेअर सेस चार्जेस रु. ९९,७०६/- तसेच ७% पी.एम.सी. चार्जेस रु. ६,९७,९४३/- लावून योजनेची मूळ किंमत रु. १,०७,६८,२६९/- इतकी होते. शासन निर्णय, दिनांक २१.२.२०१४ अन्वये अनुज्ञेय अनुदानापैकी रु.५१.०३ लक्ष वाशिम नगरपरिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांनी रु. ६२.३७ लक्ष रुपयांचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून मंजूर योजनेच्या उपांगाची ९०% कामे पूर्ण झाली असल्याचे कळविले आहे. सबब, वाशिम नगर परिषदेस अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासन निर्णय, दि.१५.३.२०१२ अन्वये, वाशिम शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून शासन निर्णय, दिनांक २१.२.२०१४ अन्वये अनुज्ञेय अनुदानापैकी रु.५१.०३ लक्ष वाशिम नगरपरिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, वाशिम नगर परिषद यांनी रु.६२.३७ लक्ष रुपयांचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून मंजूर योजनेच्या उपांगाची ९०% कामे पूर्ण झाली असल्याचे कळविले आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता वाशिम नगर परिषदेस अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान रक्कम म्हणजेच रु. **४५,८८,४४२/- (रुपये पंचेचाळीस लाख अठ्ठ्याऐंशी हजार चारशे बेचाळीस फक्त)** इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | शासनाकडून याद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| वाशिम नगर परिषद | १०७६८२६९ | ९६९१४४२ | १०७६८२७ | ११३४००० | ५१०३००० | ४५,८८,४४२ |
| एकुण रुपये | | | | | | ४५,८८,४४२ |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१४१०४५०७६७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar L Chakre

Digitally signed by Prabhakar L Chakre
DN: CN = Prabhakar L Chakre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.15 14:59:33 +05'30'

**(प्र.ल.चक्रे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
  **प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.**
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, महसुल विभाग, अमरावती विभाग,अमरावती
- जिल्हाधिकारी, वाशिम
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे.
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, नगरपरिषद, वाशिम, जि. वाशिम
- जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.